**शासकीय/अनुदानीत आश्रमशाळा तसेच शासकीय वसतीगृहातील विद्यार्थीनींबाबत होणा-या गैरप्रकारांना आळा घालण्याकरीता जिल्हा सल्लागार समिती स्थापन करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन परिपत्रक क्र. चौकशी-२००३/प्र.क्र.१५५/का.१३**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२.

दिनांक : ३ जून, २००४

**वाचा :-** १) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे परिपत्रक क्र.शाआशा-२००२/प्र.क्र.१४३/का.८(३), दिनांक १८.९.२००२ चे परिपत्रक.

२) मा. उच्च न्यायालय खंडपीठ, नागपूर यांचे पत्र क्र. ३३३३, दिनांक २३.४.२००४.

**प्रस्तावना:-** या विभागाच्या अधिनस्थ शासकीय व अनुदानित आश्रमशाळा/वसतिगृहामध्ये शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थिनींच्या संदर्भात सुरक्षिततेच्या दृष्टीने काही वेळा बऱ्याच अडचणी उद्‌भवतात. आश्रम शाळांमधून/वसतिगृहामधून होणारे लैगिक शोषण, आश्रम शाळेतील मुलींना शिक्षक व इतर कर्मचारी घरी बोलावून त्यांचेकडून घरातील कामे करुन घेणे, कपडे धुणे,स्वयंपाक, भांडी घासणे, त्यातूनच गरीब,अज्ञानी विद्यार्थिनी लैगिक अत्याचाराला बळी पडणे, तसेच विद्यार्थिनीची छेडछाड करणे इ. बाबत कर्मचाऱ्यांनी विद्यार्थीनींशी केलेल्या गैरवर्तणूकीबाबत महाराष्ट्र विधानमंडळाच्या पावसाळी अधिवेशनात शासकीय व अनुदानीत आश्रमशाळा तसेच वसतीगृहातील विद्यार्थीनीसोबत होणारे गैरप्रकार व अत्याचाराबाबत झालेल्या चर्चेच्या अनुषंगाने उपाययोजना सुचविण्याकरीता मा. मंत्री, आदिवासी विकास यांनी अपर आयुक्त, आदिवासी विकास याचे पातळीवर स्वयंसेवी संस्थांच्या महिला प्रतिनिधींचा समावेश असलेली सल्लागार समिती गठीत करण्याचा मनोदय विधानसभेत जाहिर केला होता. त्याअनुषंगाने अपर आयुक्त, आदिवासी विकास यांचेस्तरावर नाशिक/नागपूर/अमरावती व ठाणे विभागाकरीता दि. १६.९.२००२ च्या परिपत्रकान्वये चार समित्यांची स्थापना करण्यात आलेली आहे व राज्यातील १५ आदिवासी जिल्हयांमध्ये दि. १८.९.२००२ च्या परिपत्रकान्वये जिल्हास्तरीय समित्या स्थापन करण्यात आलेल्या आहेत.

मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठाने आश्रमशाळेत मुलींवर होणा-या लैंगिक अत्याचाराच्या घटनांबाबत दखल घेतली असून, दिनांक २१.४.२००४ रोजी रिट याचिका क्र. ३०८/२००३ चा निकाल देताना जिल्ह्याच्या जिल्हास्तरीय कमिटीवर एक वरीष्ठ महिला न्यायाधिश **"सहअध्यक्ष"** (Co-Chairperson) म्हणून नियुक्त करण्याबाबत आदेश दिलेले आहेत. त्यानुसार आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्या परिपत्रक क्र.शाआशा-२००२/प्र.क्र.१४३/का.८(३) दिनांक १८.९.२००२ यामध्ये सुधारणा करुन खालीलप्रमाणे सुधारीत आदेश देण्यात येत आहेत.

**शासन परिपत्रक** :-वरील प्रस्तावनेत नमुद केल्यानुसार मा. उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठाच्या आदेशानुसार सदर समितीची रचना, कार्यकक्षा, कामाचे स्वरुप, सदस्यांच्या नेमणूकीचे निकष इ.खालीलप्रमाणे करण्यात येत आहे.

१) **समितीची रचना** :-

| | |
|---|---|
| १) जिल्हाधिकारी | पदसिध्द अध्यक्ष (Chairperson) |
| २) जिल्हयाची वरीष्ठ महिला न्यायाधीश | सहअध्यक्ष (Co-Chairperson) |
| ३) जिल्हापरिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी | उपाध्यक्ष |
| ४) जिल्हापरिषदेच्या महिला व बाल कल्याण समितीच्या सभापती | सदस्य |
| ५) जिल्हापरिषदेचे उपमुख्य कार्यकारी अधिकारी (महिला व बालकल्याण) | सदस्य |
| ६) विभागीय मुख्यालयाचे/जिल्ह्याचे जिल्हा महिला व बालकल्याण अधिकारी | सदस्य |
| ७) स्वयंसेवी संस्थांच्या दोन महिला प्रतिनिधी | सदस्य |
| ८) शासकीय आश्रमशाळा/शासकीय वसतीगृहांच्या महिला मुख्याध्यापिका/ | १ सदस्य |
| महिला गृहपाल (१ सदस्य) | १ सदस्य |
| ९) अनुदानीत आश्रमशाळा महिला मुख्याध्यापिका | सदस्य |
| १०) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प (ज्या जिल्ह्यात एकापेक्षा जास्त प्रकल्प अधिकारी आहेत तेथे जिल्हा मुख्यालयाचे प्रकल्प अधिकारी किंवा जेष्ठतम प्रकल्प अधिकारी) | सदस्य सचिव |

२) **समितीचे कार्यक्षेत्र :-**

समितीचे कार्यक्षेत्र ज्या जिल्हयाकरीता समितीची स्थापना करण्यात आली आहे त्या जिल्हयापुरते मर्यादित राहील.

३) **समितीचे स्वरुप :-**

सदर समिती सल्लागार समिती म्हणून नियुक्त करण्यात येत असल्याने प्रामुख्याने आश्रमशाळा व वसतीगृहातील मुलींच्या संदर्भात होणारे गैरप्रकार व अत्याचाराबाबत तसेच समितीच्या कार्यकक्षेत नमुद इतर बाबींवर करावयाच्या उपाययोजनेबाबत अपर आयुक्तांना सल्ला देणे असे राहील.

४) **समितीचे गठण:-**

अ) ही समिती १० सदस्यांची असेल व समितीची रचना अनुक्रमांक १ मध्ये नमूद केल्याप्रमाणे असेल.

ब) समितीच्या सभेचा कोरम ६ सदस्यांचा राहील मात्र त्यात कमीत कमी दोन स्वयंसेवी संस्थांचे सदस्य उपस्थित असणे आवश्यक राहील.

क) समितीची सभा ६ महिन्यात कमीत कमी एक वेळा घेण्यात यावी व समितीने प्रत्येक सत्रात २ शासकीय, २ अनुदानित व १ शासकीय मुलींच्या वसतिगृहास प्रत्यक्ष भेट देवून पाहणी करावी.

प) **<u>सदस्य निवडीचे निकष:-</u>**

१) स्वयंसेवी संस्थेच्या महिला प्रतिनीधींची निवड करताना अशा संस्थेची स्वत:ची आश्रमशाळा वसतीगृह किंवा निवासी महिला संस्था असावी किंवा महिलांच्या क्षेत्रात उल्लेखनीय कार्य असावे. सदस्य निवडीच्या निकषानुसार समितीवर स्वयंसेवी संस्थेच्या महिला प्रतीनिधींच्या नियुक्तीचे अधिकार जिल्हाधिकारी यांना राहतील.

२) संस्था तसेच समितीवर नियुक्त करण्यात येणा-या प्रतिनीधींविरुध्द गंभीर स्वरुपाच्या तक्रारी नसाव्यात व अशी प्रतिनिधी संस्थेची पदाधिकारी असावा.

३) महिला प्रतिनीधी, मुख्याध्यापिका किंवा गृहपाल तसेच अधिका-यांचे चारित्र्य वादग्रस्त नसावे.

४) समिती सदस्यांच्या नियुक्तीबाबत संबंधित संस्था किंवा विभागास हरकत असल्यास एक महिन्यात संबंधित जिल्हाधिकारी यांना कळविण्यात यावी. एक महिन्यात हरकत प्राप्त न झाल्यास अशा संस्थेची किंवा विभागाची नियुक्तीस हरकत नसल्याचे समजण्यात यावे.

**फ)** समिती सदस्य कोणतेही भत्ते किंवा इतर सवलतींनां पात्र राहणार नाहीत. समिती सदस्यांचा प्रवास व इतर खर्च संबंधित संस्था वा कार्यालयास सहन करावा लागेल. मात्र आश्रमशाळा, वसतीगृहांस समितीच्या एकत्रित भेटी प्रसंगी वाहतूकीची व्यवस्था कार्यालयामार्फत करण्यात येईल.

**भ)** कोणत्याही सदस्याविरुध्द तक्रार प्राप्त झाल्यास जिल्हाधिकारी त्याबाबत कार्यवाही करुन आवश्यक वाटल्यास अशा सदस्यांचे सदस्यत्व रद्द करु शकतील व या संदर्भातील त्यांचा निर्णय अंतिम राहील.

५) **<u>समितीचे कार्य:</u>**

१) शासकीय / अनुदानीत आश्रमशाळा व वसतीगृहातील विद्यार्थ्यांच्या समस्या व तक्रारी जाणून घेणे, चौकशी करणे व उपाययोजना सूचविणे.

२) विद्यार्थ्यांना देण्यात येणा-या भौतिक सुविधांबाबत उपाययोजना सूचविणे.

३) विद्यार्थीनींचे मूल्य शिक्षण व सर्वांगीण विकासाच्या दृष्टीने उपाययोजन सूचविणे.

४) शालेय पर्यवेक्षण व शालेय पर्यावरण याबद्दल उपाययोजना सूचविणे.

५) मुलींचे आरोग्य, व्यक्तीगत स्वच्छता, परिसर स्वच्छता इ. बाबत उपाययोजना सूचविणे.

६) समिती पुर्वसूचनेशिवाय आश्रमशाळा व वसतीगृहांना भेटी देवून पाहणी करेल. मुलींशी कर्मचा-यांच्या अपरोक्ष किंवा उपस्थितीत चर्चा करुन अडीअडचणी, तक्रारी, उपाययोजना व सुविधांची माहिती घेवून त्याचे पृथ्थकरण करुन कारणमिमांसा समजावून घेऊन त्याबाबत संस्थाप्रमुखांशी विचारविनीमय करु शकेल.

६) <u>समितीच्या अहवालावर कार्यवाही :</u>

१) सदरहू समितीने दोन महिन्यातून किमान एक वेळा ४ आश्रमशाळा व २ वसतीगृह यांना शाळा सुरु असताना पुर्वसूचनेशिवाय भेटी द्याव्यात व तेथील मुलींना विश्वासात घेऊन त्यांचेवर होणा-या लैंगिक अत्याचार व गैरवर्तणूकीबाबत चौकशी करावी.

२) त्यानंतर समितीने आपला अहवाल जिल्हा न्यायाधिश, जिल्हाधिकारी व अपर आयुक्त यांचेकडे परस्पर पाठवावा. प्रस्तावनेत उल्लेखिलेल्या मा. उच्च न्यायालयाच्या ओदशानुसार जिल्हा न्यायाधिशावर "निरीक्षक" (observer) ची जबाबदारी सोपविली असून, उच्च न्यायालयाकडे जिल्हान्यायाधिशांनी अहवाल सादर करणे अपेक्षित आहे.

३) सदरहू अहवालावर अपर आयुक्त (आ.वि.) यांनी सत्वर अभ्यास करुन आवश्यक वाटल्यास समितीच्या सदस्यांशी चर्चा करुन सूचनांबाबत योग्य कार्यवाही करतील.

४) जिल्हयाची वरिष्ठ महिला न्यायाधिश यांचा समितीच्या बैठकीसाठी व आकस्मिक तपासणी/ निरीक्षणासाठी दौरा तसेच प्रवास व निवासाचा खर्च (टी.अे.डी.अे.) त्यांच्या पदानुसार मंजूर करण्यात यावा. सदर खर्च प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास यांचे अधिनस्त ठेवण्यात आलेल्या निधीतून करण्यात यावा.

आयुक्त व संबंधित अपर आयुक्त यांनी सदर आदेशाची तात्काळ अंमलबजावणी करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(मफिउल हुसेन)
सह सचिव